जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (प्रशासन) अंतर्गत
करारपध्दतीवर नेमलेल्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या
मानधनात वाढ करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय, क्रमांकः जिग्राप्र-२०१०/प्र.क्र.१३२/योजना-५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २१ जुलै, २०११.

वाचा :- १) केंद्र शासनाचं पत्र क्रमांक: आर-२००१५/१८/२००६/DRDA,
दिनांक १ मे, २००६
२) शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,दिनांक :१७ मार्च, २००४.
३) अ.शा.पत्र क्रमांक:जिग्राप्र-२००६/प्र.क्र.७५२/योजना-५
दिनांक : २२ ऑगस्ट, २००६, दिनांक ३ ऑगस्ट, २००७

**प्रस्तावना** :-

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (प्रशासन) ही केंद्र पुरस्कृत योजना असून यात जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेतील अधिकारी/ कर्मचारी यांचे वेतन व भत्ते खर्च भागविण्याकरिता केंद्र व राज्य शासनाकडून ७५:२५ या प्रमाणात निधी दिला जातो. जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडील विविध योजनांच्या अंमलबजावणीकरिता जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा कार्यालयात शासन निर्णय. दि.१७ मार्च, २००४ अनूसार विविध पदे निर्माण करण्यात आलेली आहेत. सदरची पदे शासनाच्या विविध विभाग तसेच जिल्हा परिषदेमधून प्रतिनियुक्तीने भरण्यात येतात. तथापि, प्रतिनियुक्तीने कर्मचारी उपलब्ध न झाल्याने पदे रिक्त राहतात व त्याचा परिणाम केंद्र पुरस्कृत योजना अंमलबजावणीवर होत असल्याचे निदर्शनास आल्याने केंद्र शासनाच्या निर्देशानुसार जिल्हा ग्रामीण विकास योजनेमधील रिक्त पदे करारपध्दतीने भरण्याचा निर्णय शासनाने घेतलेला होता.

२. सदर करारपध्दतीवरील पदांचे मानधन उपरोक्त संदर्भाधीन शासननिर्णयानुसार निश्चित केलेले आहे. तथापि, दैनंदिन महागाईमुळे व ६ व्या वेतन आयोगानुसार असलेले नियमीत पदांचे वेतन व इतर योजनांतर्गत देण्यात येणारे मानधन यापेक्षा जिल्हा ग्रामीण

विकास यंत्रणाअंतर्गत करारपध्दतीने नेमलेल्या पदांना देण्यात येत असलेल मानधन कमी असल्याने त्यात वाढ करण्याची मागणी जिल्हास्तरावरुन करारपध्दतीवरील कर्मचारी/अधिकाऱ्यांकडून केलेली आहे. तसेच कमी मानधनामुळे हे कर्मचारी/अधिकारी ११ महिन्यांचा कराराचा कालावधी पूर्ण होण्यापूर्वीच काम सोडून जात असल्याचे निदर्शनास आले आहे. परिणामी दैनंदिन कार्यालयीन कामकाज व ग्रामीण विकासाच्या विविध योजनांच्या अंमलबजावणीत अडचणी येत असल्याचे जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणानी शासनाच्या निदर्शनास आणून दिलेले आहे. त्यामुळे करारपध्दतीवरील कर्मचारी/अधिकारी यांच्या मानधनात वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. तदनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय** :-

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा -प्रशासन अंतर्गत विविध पदांच्या कामकाजाचे स्वरुप व मागणी विचारात घेऊन करारपध्दतीवर नेमलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या मानधनात खालीलप्रमाणे वाढ करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे.

| अ.क्र. | पदाचे नांव | वर्ग | सध्याचे मानधन (रुपये) | सुधारित मानधन (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | सहाय्यक प्रकल्प अधिकारी (पशु) | एक | १०,०००/- | १५,०००/- |
| २ | सहाय्यक प्रकल्प अधिकारी (उद्योग) | दोन | ८,०००/- | १२,०००/- |
| ३ | सहाय्यक प्रकल्प अधिकारी (रोजगार) | दोन | ८,०००/- | १२,०००/- |
| ४ | सहाय्यक प्रकल्प अधिकारी (पाणलोट) | एक | १०,०००/- | १५,०००/- |
| ५ | सहाय्यक प्रकल्प अधिकारी (संनियंत्रण) | दोन | ८,०००/- | १२,०००/- |
| ६ | सहाय्यक प्रकल्प अधिकारी (महिला शाखा) | दोन | ८,०००/- | १२,०००/- |
| ७ | उप अभियंता | एक | १०,०००/- | १५,०००/- |
| ८ | लेखधिकारी (वित्त) | दोन | ८,०००/- | १२,०००/- |
| ९ | तांत्रिक सहाय्यक (महिला) | तीन | ४,००० | ९,०००/- |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १० | लिपिक टंकलेखक | तीन | ३५००/- | ७,०००/- |
| ११ | तांत्रिक सहाय्यक (पाणलोट) | तीन | ६०००/- | १०,०००/- |
| १२ | कॉम्प्युटर प्रोग्रॅमर | तीन | ६०००/- | १०,०००/- |

२. सदर सुधारित मानधन दि १.जुलै, २०११ पासून लागू करण्यात येत असून यापूर्वीच्या कालावधीसाठी हे सुधारित मानधन लागू असणार नाही.

३. सदर सुधारित मानधनासाठी होणारा खर्च हा "जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन" साठी प्राप्त होणाऱ्या निधीतून (७५% केंद्र व २५%राज्य शासन) मागणी क्र.एल-३, २५१५, इतर ग्रामीण विकास कार्यक्रम-८०० इतर खर्च (०१) (०२) जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना सहा.अनुदान या लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४० दि.२७.६.२०११ अन्वये त्यांच्या मान्यतेने व सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक 201107211036544009 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(अविनाश सुभेदार )
उप सचिव.

प्रत,

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
२) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)
४) प्रकल्प संचालक जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)
५) सचिव, ग्रामीण विकास तंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली
६) प्रधान सचिव, वित्त विभाग,(व्यय-१५), मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८) सचिव, (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
९) सचिव, (पदुम), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग , मंत्रालय, मुंबई
११) सचिव, ग्राम विकास विभाग,मंत्रालय, मुंबई
१२) सचिव, जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) विभागीय आयुक्त, (विकास), सर्व
१४) जिल्हाधिकारी ( मुंबई व मुंबई उपनगर वगळून) सर्व
१५) अतिरिक्त संचालक, प्रकल्प आखणी व एग्राविका कक्ष

१६) संचालक, अर्थ व सांख्यिक संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१७) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१८) कृषी संचालक, महाराष्ट्र शासन, पुणे
१९) संचालक, पशुसंवर्धन संचालनालय, महाराष्ट्र शासन, पुणे
२०) आयुक्त, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई
२१) सहकार आयुक्त व प्रबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२२) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य,मुंबई
२३) वित्त विभाग, व्यय-१५/अर्थ-१७ मंत्रालय, मुंबई
२४) कार्यासन वित्त-१, अर्थसंकल्प शाखा, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
२५) ग्राम विकास विभाग, कार्यासन क्रमांकःआस्था-३, आस्था-८, योजना-१ योजना-२, योजना-३,योजना-४,योजना-१०,पंरा-६ जल-८, जल-२०
२६) निवडनस्ती, कार्यासन क्रमांक योजना-५,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.